**भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचा**
**सन २००७-०८ चा " महसुली जमा " अहवाल.**
परिच्छेद क्रमांक १.१०, १.११, १.१२, १.१३,
१.१४ व १.१५ बाबतची कार्यवाही.

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
शासन परिपत्रक क्रमांक : भानिम-१७.०९ / प्र.क्र. ९४ / लोलेस
दिनांक : १० जून, २०१०.

वाचा :
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : PAC - १३६६ / ८८५६ - VII, दिनांक १० जुलै, १९६७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : INS - १०८३ / CR २५८ / ८५ / ADM - ११, दिनांक १० डिसेंबर, १९८५.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : भानिम - १२०० / प्र. क्र. २०५ / लोलेस, दिनांक १८ जानेवारी, २००१
४) प्रधान महालेखापाल ( लेखापरीक्षा ) - १, महाराष्ट्र, मुंबई यांच पत्र क्रमांक : एसआरए / सी - ११३ / एआर २००७-०८ / १७०, दिनांक ११ जून, २००९

**<u>प्रस्तावना :</u>** भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांच्या दिनांक ३१ मार्च, २००८ रोजी संपलेल्या वर्षाच्या अहवाल संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये या विभागास प्राप्त झाला होता. सदर अहवाल दिनांक १२ जून, २००९ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आला. सदर अहवाल या विभागाचे परिपत्रक क्रमांक : भानिम - १७०९ / प्र. क्र. ७४ / लोलेस, दिनांक १२ जून, २००९ अन्वये सर्व मंत्रालयीन विभागांना उचित कार्यवाहीसाठी पाठविण्यात आला होता. सदर अहवालामध्ये खालील बाबी परिच्छेदांद्वारे महालेखापरीक्षकांनी निदर्शनास आणून दिलेल्या बाबींचा थोडक्यात तपशील पुढीलप्रमाणे आहे.

परि क्र. १.१०) २००७-०८ या वर्षामध्ये विक्रीकर, जमीन महसूल, राज्य उत्पादन शुल्क, मोटार वाहन कर, मुद्रांक आणि नोंदणी शुल्क, विद्युत शुल्क, इतर कर जमा रकमा, वनविषयक जमा आणि इतर करेतर जमा रकमा यांच्या अभिलेख्यांची चाचणीदाखल तपासणी केली असता ५९१०० प्रकरणांत रु १००६.२६ कोटीची न्यून निर्धारणा / न्यून आकारणी / महसूल हानी झाल्याचे आढळून आले. वर्षभरात विभागाने २००७-०८ आणि त्या आधीच्या वर्षात निदर्शनास आणून दिलेल्या २८,७१५ प्रकरणांत रु. ४६.६५ कोटीची न्यून निर्धारणा मान्य केली आणि रुपये ३७.८६ कोटी वसूल केले. उर्वरित प्रकरणांतील उत्तरे प्राप्त झाली नाहीत.

या अहवालामध्ये रु. ८१८.९० कोटी एवढी रक्कम अंतर्भुत असलेल्या कर, शुल्क, व्याज आणि दंड इत्यादींची आकारणी न करणे / कमी करणे यांच्या संबंधातील दोन आढाव्यांसह ३६ परिच्छेदांचा समावेश आहे. विभागाने / शासनाने रु. १६७.४४ कोटीचा समावेश असलेले लेखापरीक्षा निष्कर्ष

स्वीकारले. त्यापैकी नोव्हेंबर, २००८ पर्यंत रु. ४.४८ लाख व्याजासह रु.३४.०७ कोटी वसूल केले. इतर प्रकरणांबाबत उत्तरे प्राप्त झाली नाहीत.

परि क्र.१.११) मंत्रालयीन विभागांकडे दिनांक ३१ डिसेंबर, २००७ पर्यंत पाठविलेल्या तपासणी अहवालांपैकी रुपये १००९.१९ कोटी रक्कम अंतर्भुत असलेले ४५६६ तपासणी अहवालातील १००३७ आक्षेप जून, २००८ अखेरीपर्यन्त प्रलंबित असल्याचे दिसून आले. यापैकी रुपये ३९७ कोटींचा अंतर्भाव असलेले ३१६४ आक्षेप असलेल्या १६३४ तपासणी अहवालांबाबत चार वर्षाहून अधिक काळ निर्णय घेण्यात आला नव्हता.

रूपये ३७.१९ कोटींचा अंतर्भाव असलेल्या ६३५ तपासणी अहवालांशी संबंधित डिसेंबर, २००७ पर्यंत पाठविण्यात आलेल्या १८५३ परिच्छेदांच्या बाबतीत एक महिन्याच्या आत कार्यालय प्रमुखांकडून प्राप्त होणे आवश्यक असलेले पहिले उत्तरही प्राप्त झालेले नव्हते.

परि क्र. १.१२) प्रलंबित लेखापरीक्षा आक्षेप त्वरेने निकालात काढण्याच्या दृष्टीने सन २००७-०८ या वर्षात आठ शासकीय विभागांपैकी वित्त विभागाने सहा, गृह विभागाने पाच, महसूल व वन विभागाने ( मदत आणि पुनर्वसन ) सहा, उद्योग, उर्जा व कामगार विभागाने एका बैठकीचे आयोजन केले होते. नगर विकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम, जलसंपदा, सहकार या विभागांनी बैठका आयोजित केल्या नव्हत्या. यावरून असे दिसून आले की, प्रलंबित लेखापरीक्षा निरीक्षणांच्या बाबतीत निर्णय घेण्यासाठी निर्माण केलेली यंत्रणा शासकीय कार्यालयांनी परिणामकारकरित्या राबविली नाही.

परि क्र. १.१३) भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे अहवालामध्ये अंतर्भुत करण्यासाठी प्रस्तावित केलेल्या प्रारुप लेखापरीक्षा परिच्छेदांबाबत उत्तरे सहा आठवड्यांच्या मुदतीत महालेखापाल कार्यालयाकडे पाठविणे आवश्यक आहे. प्रारुप परिच्छेद हे नेहमी त्या त्या लेखापरीक्षा कार्यालयाकडून संबंधित विभागांच्या सचिवांना, लेखापरीक्षा निष्कर्षांवर त्यांचे लक्ष वेधण्याच्या व विहित वेळेत त्यांचे उत्तर पाठविण्याची विनंती करणाऱ्या अर्धशासकीय पत्राद्वारे पाठविले जातात. त्यावर शासनाकडून उत्तरे प्राप्त न झाल्याची वस्तुस्थिती लेखापरीक्षा अहवालाच्या अशा प्रत्येक परिच्छेदाच्या शेवटी न चुकता दर्शविण्यात येते.

भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांच्या सन २००७-०८ च्या महसुली जमा अहवालात अंतर्भुत असलेले प्रारुप परिच्छेद त्या त्या विभागाच्या सचिवांकडे एप्रिल ते ऑगस्ट, २००८ च्या दरम्यान अर्धशासकीय पत्रान्वये महालेखापाल कार्यालयाकडून पाठविण्यात आले. यापैकी बहुतांशी प्रारुप परिच्छेदांना उत्तरे मिळाली नाहीत असे ३६ परिच्छेदांमध्ये एकत्र केलेले परिच्छेद या अहवालांत अंतर्भुत करण्यात आलेले आहेत.

परि क्र. १.१४) महसुली जमा अहवालात समाविष्ट केलेल्या तथापि लोकलेखा समितीने अद्याप चर्चा न केलेल्या परिच्छेदांच्या प्रलंबित स्पष्टीकरणात्मक ज्ञापनांच्या

आढाव्यावरुन असें दिसून येते की, दिनांक ३० ऑगस्ट, २००८ पर्यंत विभागांनी १९९७-९८ ते २००५-०६ (१९९९-२००० व्यतिरिक्त) ४९ परिच्छेदांवर स्पष्टीकरणात्मक ज्ञापने सादर केली नाहीत. त्याचप्रमाणे लोकलेखा समितीच्या अहवालातील शिफारशींपैकी ४६ शिफारशींबाबत संबंधित विभागांकडून कार्यवाही केल्याच्या टिप्पण्या अद्याप प्राप्त झालेल्या नाहीत.

परि क्र. १.१५) २००१-०२ ते २००६-०७ मधील वर्षात विभागांनी / शासनाने रुपये २४०६.८७ कोटीचा अंतर्भाव असलेली लेखापरीक्षा आक्षेप मान्य केले. त्यापैकी ३१ मार्च, २००८ पर्यंत रुपये ८३८.७४ कोटीची रक्कम वसूल झाली. संबंधित सचिव यांच्याकडे अनेकवेळा ही बाब नेण्यात येऊनसुद्धा लेखापरीक्षणात निदर्शनास आणून दिलेल्या देय रकमेची वसुली अतिशय असामाधानकारक आहे.

## प रि प त्र क

महालेखापरीक्षकांच्या वरील शिफारशींच्या अनुषंगाने सर्व मंत्रालयीन विभागांना आता असे निर्देशित करण्यात येते की, लेखापरीक्षा आक्षेपांचा गांभीर्याने विचार करून ते तातडीने निकाली काढून अनुपालन अहवाल महालेखापालांना सादर करावा व पुन्हा पुन्हा अशा प्रकारचे आक्षेप न येण्यासाठी खालीलप्रमाणे तात्काळ कार्यवाही करावी.

१) महालेखापालांच्या सर्व प्रलंबित लेखा आक्षेपांचा व स्पष्टीकरणात्मक ज्ञापनांचा प्रशासकीय प्रमुखांनी प्रत्येक महिन्याला आढावा घ्यावा. जेणेकरून गंभीर स्वरुपाच्या वित्तीय अनियमितता व नुकसान होणार नाही.

२) लेखापरीक्षा समितीच्या विभागवार बैठका नियमित आयोजित करण्यासाठी प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुखांना सूचना देण्यात याव्यात व बैठका होत असल्याची खात्री करावी.

३) सदर विभागीय लेखापरीक्षा समितीच्या घेण्यात आलेल्या बैठकांमध्ये निकाली काढण्यात आलेल्या प्रलंबित निरिक्षण अहवाल / परिच्छेदाची माहिती महालेखापाल तसेच वित्त विभागास दरमहा देण्यात यावी.

४) ज्या विभागाच्या लेखापरीक्षा समितीच्या बैठका होणार नाहीत, त्या विभागातील संबंधित समितीचा अध्यक्ष हा शासकीय हिताचे रक्षण आणि जबाबदारी चे पालन न केल्याबदल जबाबदार राहील, व त्यांच्यावर शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यात यावी.

५) निरीक्षण अहवालामध्ये रक्कम अंतर्भुत आहे, अशा सर्व निरीक्षण अहवालांवर तात्काळ निर्णय घेऊन रक्कम वसूल करावी व निरीक्षण अहवाल निकाली काढण्याबाबत आवश्यक त्या उपाययोजना करण्यात याव्यात.

६) महालेखापाल कार्यालयाकडून प्राप्त होणाऱ्या निरीक्षण अहवालावर एक महिन्यामध्ये कार्यवाही करावी.

७) महालेखापाल यांच्या प्रारुप परिच्छेदांची उत्तरे सहा आठवड्यांच्या मुदतीत पाठविली जातील, याची दक्षता घेण्यात यावी.

८) महालेखापरीक्षक यांच्या अहवालातील परिच्छेदांवरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने ज्या विभागांनी लोकलेखा समितीकडे अद्याप पाठविलेली नाहीत, ती त्वरीत पाठविण्याची दक्षता घेण्यात यावी.

९) लोकलेखा समितीने केलेल्या शिफारशींवरील कार्यवाही कृति टिप्पण्या (Action Taken Notes) समितीकडे महालेखापालाच्या मान्यतेने त्वरीत पाठविण्यात याव्यात.

१०) महालेखापाल यांनी चाचणीदाखल तपासणीमध्ये निदर्शनास आणून दिलेले न्यून निर्धारण विभागाने मान्य केले आहे, अशा सर्व प्रकरणी १०० टक्के वसुलीची कार्यवाही करावी.

3 वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे व त्यानुसार कार्यवाही न करणाऱ्या अधिकाऱ्यांविरुद्ध जबाबदारी निश्चित करून आवश्यक कारवाई करण्यात यावी.

3 सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००६१०१४२६०४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**( कृ. शे. कांबळे )**
**उपसचिव, वित्त विभाग**

प्रति

अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय,
विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, माझगांव, मुंबई - ४०० ०१०,
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
उपसचिव, कार्यासन कोषा प्रशासन /ऋण व हमी संनियंत्रण कक्ष, वित्त विभाग,
विशेष कार्य अधिकारी, कराधान - ३, वित्त विभाग,
सहसंचालक, अल्पबचत संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
उपसंचालक, महाराष्ट्र राज्य लॉटरी, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
प्रधान महालेखापाल ( लेखापरीक्षा ) - १, मुंबई, यांना त्यांचे पत्र क्रमांक : SRA / C ११३ / AR - २००७-०८ / ७०, दिनांक ११ जून, २००९ च्या पत्राच्या अनुषंगाने अग्रेषित,
महालेखापाल ( लेखापरीक्षा ), नागपूर,
उपसचिव, लोकलेखा समिती, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
यांना माहितीसाठी अग्रेषित.
नस्ती क्रमांक : भानिम-१७.०९ / प्र.क्र. ७३ / लोलेस,
नस्ती क्रमांक : भानिम-१७.०९ / प्र.क्र. ७४ / लोलेस,
निवड नस्ती, कार्यासन लोलेस.